**टीजेएसबी सहकारी बँक मर्यादित, या नागरी सहकारी बँकेस शासकीय बँकिंग व्यवहार हाताळण्यास परवानगी देणे आणि आर्थिकदृष्टया सक्षम व नियमानुकूल व्यावसायिकता बाळगणाऱ्या तसेच "वित्तीयदृष्टया सुदृढ व सुव्यवस्थापित" असल्याबाबतचे विहित निकष पूर्ण करणाऱ्या नागरी सहकारी बँकांना देखील उपरोल्लेखित प्रयोजनासाठी पात्र करण्यास मान्यता देणे आणि त्यासाठी दरवर्षी अनुसरावयाची कार्यपध्दती विहित करण्यास मान्यता देणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२५/प्र.क्र. ११ /२५/कोषा.प्रशा.-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १८ मार्च, २०२५

**वाचा :** १. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक शासन निर्णय क्रमांक : शासाउ - १०.१५/ प्र.क्र.४२/ सा.उ., दि.२७ ऑक्टोबर, २०१५.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२०/ प्र.क्र.५१/२०/ कोषा-प्रशा ५, दि.१३ मार्च, २०२०.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२०/ प्र.क्र.५१/ २०/कोषा-प्रशा ५, दि.१३ ऑगस्ट २०२०.

४. भारतीय रिझर्व्ह बँकेच्या नियमन विभागाचे परिपत्रक No.RBI/2022-23/ 143/DOR.REG. No./ 07.01.000/2022-23, dated 1st December, 2022.

**प्रस्तावना-**

(अ) उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक २ समोर नमूद शासन निर्णयान्वये शासकीय कार्यालये, सार्वजनिक उपक्रम व महामंडळे इत्यादींकडील बँकींग विषयक व्यवहार केवळ राष्ट्रीयकृत बँकांमार्फत करण्याचे धोरण घोषित करण्यात आले होते. त्यानुषंगाने शासकीय बँकींग विषयक व्यवहार करण्यास तसेच सार्वजनिक उपक्रम व महामंडळे यांच्याकडील अतिरिक्त निधी गुंतविण्यासाठी केवळ राष्ट्रीयकृत बँकांनाच मान्यता देण्यात आली होती.

(आ) तथापि, दरम्यानच्या काळामध्ये राज्यातील काही जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी शासकीय बँकींग व्यवहार करण्यास परवानगी देण्याची मागणी शासनाकडे केली होती. त्यास अनुसरुन सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने केलेल्या शिफारशीनुसार शासकीय निधीची सुरक्षितता विचारात घेऊन, आर्थिकदृष्टया सक्षम असलेल्या आणि नियमानुकूल व्यावसायिकता बाळगणाऱ्या १५ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना राष्ट्रीयकृत बँकांप्रमाणेच ठेवी ठेवण्यास व सर्व प्रकारचे बँकींग व्यवहार करण्याकरीता मा.मंत्रिमंडळाने दि. ८ जुलै, २०२० रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मान्यता दिली होती. तसेच दरवर्षी बँकांच्या लेखापरीक्षण अहवालात बदल होण्याची शक्यता विचारात घेता, बँकांची यादी प्रतिवर्षी

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या सल्लयाने वित्त विभाग सुधारित करेल, असे निर्देश मा.मंत्रिमंडळाने दिले होते. त्याप्रमाणे दरवर्षी वित्त विभागाद्वारे कार्यवाही करण्यात येते.

(इ) टीजेएसबी सहकारी बँक मर्यादित या बहुराज्यीय कार्यक्षेत्र असलेल्या नागरी सहकारी बँकेला शासकीय कार्यालयांच्या बँकींग व्यवहारांसाठी आणि सार्वजनिक उपक्रम / महामंडळे यांचेकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीसाठी पात्र ठरविण्याबाबत सदर बँकेकडून शासनास विनंती करण्यात आलेली आहे. सदर नागरी सहकारी बँकेला शासकीय कार्यालयांच्या बँकींग व्यवहारांसाठी आणि सार्वजनिक उपक्रम/महामंडळे यांचेकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीसाठी पात्र करावयाचे झाल्यास; त्यासाठी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या धर्तीवर नागरी सहकारी बँकांना शासकीय कार्यालयांच्या बँकींग व्यवहारांसाठी आणि सार्वजनिक उपक्रम/महामंडळे यांचेकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीसाठी पात्र करणेबाबत धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात मा.मंत्रिमंडळाने दि. २५ फेब्रुवारी, २०२५ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

(१) टिजेएसबी सहकारी बँक मर्यादित ही नागरी सहकारी बँक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांसंदर्भात मा.मंत्रिमंडळाच्या दि.८ जुलै, २०२० रोजीच्या बैठकीत अपेक्षिलेले आर्थिक सक्षमता आणि नियमानुकूल व्यावसायिकतेबाबतचे निकष पूर्ण करीत असल्याने; तसेच "वित्तीयदृष्टया सुदृढ व सुव्यवस्थापित" म्हणून वर्गीकृत होण्यासंदर्भातील भारतीय रिझर्व्ह बँकेद्वारे विहित करण्यात आलेले निकष व प्रक्रिया पूर्ण करीत असल्याने; सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी सदर बँकेस शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान करण्यासाठीचे आहरण व संवितरण अधिकाऱ्यांचे बँक खाते आणि निवृत्तीवेतनधारकांचे वैयक्तिक बँक खाते उघडण्याकरीता; तसेच सार्वजनिक उपक्रम / महामंडळे यांचेकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीकरीता प्राधिकृत करणेस मान्यता देण्यात येत आहे.

(२) राज्यांतर्गत कार्यक्षेत्र असणाऱ्या नागरी सहकारी बँकांच्या संदर्भात उपरोल्लेखित आर्थिकदृष्टया सक्षमतेबाबत आणि नियमानुकूल व्यावसायिकतेबाबतचे निकष पूर्ण करीत असल्याबाबत तसेच "वित्तीयदृष्टया सुदृढ आणि सुव्यवस्थापित" म्हणून वर्गीकृत होण्यासंदर्भातील भारतीय रिझर्व्ह बँकेद्वारा विहित करण्यात आलेले निकष आणि त्यासंदर्भातील प्रक्रिया पूर्ण केल्याबाबत सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभागाद्वारे शिफारस करण्यात येईल अशा नागरी सहकारी बँकांना, शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान करण्यासाठीचे आहरण व संवितरण अधिकाऱ्यांचे बँक खाते आणि निवृत्ती वेतनधारकांचे वैयक्तिक बँक खाते उघडण्याकरीता; तसेच सार्वजनिक उपक्रम / महामंडळे यांचेकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीकरीता प्राधिकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यतेस अनुसरुन इच्छुक बँकांनी समुचित प्रस्ताव सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत वित्त विभागास सादर करणे आवश्यक राहील.

(३) बहुराज्यीय कार्यक्षेत्र असणाऱ्या नागरी सहकारी बँकांच्या संदर्भात उपरोल्लेखित प्रमाणे आर्थिकदृष्टया सक्षमतेबाबत आणि नियमानुकूल व्यावसायिकतेबाबतचे निकष पूर्ण करीत असल्याबाबत प्रथम केंद्रीय निबंधक कार्यालयाचे अभिप्राय घेऊन; तसेच "वित्तीयदृष्टया सुदृढ आणि सुव्यवस्थापित" म्हणून वर्गीकृत होण्यासंदर्भातील भारतीय रिझर्व्ह बँकेद्वारे विहित करण्यात आलेले निकष आणि त्यासंदर्भातील प्रक्रिया पूर्ण केल्याबाबत सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभागाद्वारे शिफारस करण्यात येईल अशा बहुराज्यीय कार्यक्षेत्र असणाऱ्या नागरी सहकारी बँकांना शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतन व

भत्त्यांचे प्रदान करण्यासाठीचे आहरण व संवितरण अधिकाऱ्यांचे बँक खाते आणि निवृत्तीवेतनधारकांचे वैयक्तिक बँक खाते उघडण्याकरीता; तसेच सार्वजनिक उपक्रम / महामंडळे यांचेकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीकरीता प्राधिकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यतेस अनुसरुन इच्छुक बँकांनी समुचित प्रस्ताव सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत वित्त विभागास सादर करणे आवश्यक राहील.

(४) दरवर्षी नागरी सहकारी बँकांच्या लेखापरीक्षण अहवालात बदल होण्याची शक्यता विचारात घेता, प्रस्तुत प्रयोजनार्थ नागरी सहकारी बँकांची यादी दरवर्षी जुलै-ऑगस्ट महिन्यात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या सल्ल्याने वित्त विभाग सुधारित करील.

(५) क्षेत्रिय स्तरावर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी बँकींग व्यवहार व गुंतवणूकीसंदर्भात निर्णय घेताना, निधीची सुरक्षितता व तरलता सुनिश्चित करण्यासाठी, सदर नागरी सहकारी बँक आर्थिक सक्षमता आणि नियमानुकूल व्यावसायिकतेबाबतच्या निकषांची पूर्तता करीत असल्याची खात्री करुनच जाणीवपूर्वक निर्णय घ्यावा.

(६) सदर शासन निर्णयातील तरतूदी नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आणि पंचायती राज संस्था यांना लागू करणेबाबत अनुक्रमे नगर विकास विभाग आणि ग्राम विकास विभाग यांनी त्यांच्या स्तरावर स्वतंत्रपणे निर्णय घ्यावा.

(७) उपरोक्त **'वाचा'** मधील अनुक्रमांक १ समोर नमूद दि.२७ ऑक्टोबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या अतिरिक्त निधीच्या गुंतवणूकीसंदर्भात मार्गदर्शक तत्वे / सूचना विहित करण्यात आलेल्या आहेत. दि.२७ ऑक्टोबर, २०१५ रोजीच्या उपरोल्लेखित शासन निर्णयातील परिच्छेद क्र. (क) मधील अ.क्र. (i) मधील नक्त मूल्याविषयीची तरतूद वगळता, अन्य सर्व मार्गदर्शक तत्वे / सूचना अबाधित ठेवण्यात येत असून, त्यांचे काटेकार अनुपालन करणे सर्व संबंधितांसाठी आवश्यक राहील.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०३१८१७५१०२११०५ असा आहे. प्रस्तुत शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2025.03.18 17:53:04 +05'30'

**( डॉ.राजेंद्र सुमन उत्तमराव गाडेकर )**
**शासनाचे उप सचिव,**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,
५. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य. सर्व मंत्रालयीन
८. प्रशासकीय विभाग,
९. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
१०. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१३. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१५. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१६. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१७. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१८.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१९.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
२०.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
२१.प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
२२.मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२३.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
२४.सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी,
२५.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२८.प्रादेशिक सह संचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/ नाशिक/छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/नागपूर
२९.संचालक,स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, नवी मुंबई,
३०.प्रादेशिक सह संचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/पुणे/नाशिक/ छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/ नागपूर,
३१.वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजी नगर / अमरावती/ नागपूर
३२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३३.वित्त विभागातील सर्व कार्यासने,
३४.निवड नस्ती कोषा प्र.५